वर उल्लेख केलेल्या प्रयुक्त कलावंताव्यतीरिक्त, सांस्कृतिक क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केलेली व्यक्ती.

(२) परिच्छेद १ मध्ये निर्देशित केलेल्या व महाराष्ट्रात कार्यक्षंत्र असलेल्या प्रत्येक क्षेत्रातील एका मान्यवर व्यक्तीला पुरस्कार देण्यात येईल. परंतु एखाद्या वर्षी, एखाद्या क्षेत्रात पुरस्कारपात्र एकही व्यक्ती नसेल व दुस-या क्षेत्रात एकापेक्षा जास्त व्यक्ती पुरस्कारपात्र असतील तर त्या क्षेत्रातील एकापेक्षा जास्त व्यक्तींना पुरस्कार देण्यास प्रत्यवाय नाही. परंतु एका वर्षात जास्तीत जास्त सात व्यक्तींना पुरस्कार देण्यात येईल.

(३) प्रत्येक पुरस्कार प्राप्त कलावंताला एक स्मरणचिन्ह, शाल व श्रीफळ आणि रोख रुपये ५,१०१ देण्यात येतील.

२. यासाठी मराठी चित्रपट, नाटय, संगीत, तमाशा, शाहीरी, इत्यादी क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींची एक निवड समिती नियुक्त करण्यासंबंधीचे आदेश स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. अशा समिमतीतर्फे पारितोषिक पात्र प्रतिथयश कलाकारांची निवड करण्यात येईल.

३. हया योजनेसाठी लागणारा खर्च ------------ हया लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावा. चालू वित्तीय वर्षात या शिर्षाखाली रुपये -------- ची तरतूद करण्यात आलेली आहे आणि तो खर्च त्या तरतूदीमधूनच भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ----------------------------- दिनांक ------------------- अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत -

संचालक, सांस्कृतिक कार्य,

वित्त विभाग, / नियोजन विभाग,

वेतन व लेखा अधिकारी,/ निवासी लेखा अधिकारी,

माहिती व जनसंपर्क संचालनालय. (या विषयी योग्य ते प्रसिध्दी पत्रक ताबडतोब काढण्यात यावे.)

**५) - अधिसूचना नमुना**

महाराष्ट्र शासन

------------- विभाग

मंत्रालय, मुंबई, दिनांक ---------

अधिसूचना

विषय------------------

क्रमांक------------------

मजकूर

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही /--

सचिव महाराष्ट्र शासन------- विभाग

महाराष्ट्र शासन राजपत्र भाग ------ मध्ये प्रसिध्द करावी आणि -----विभागाकडे ----प्रति पाठवाव्या

**अधिसूचनेचा नमुना**

सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ६ एप्रिल १९८८

**महाराष्ट्र शासनाची कार्यनियमावली**

क्रमांक आरओबी. ११७८/अठरा (ओ.ॲण्ड एम.)/(२) --

महाराष्ट्र शासनाच्या कार्य नियमावलीतील नियम ६ च्या उपबंधास अनुसरुन महाराष्ट्राचे मुख्यमंत्री, आदिवासी विकास या संबंधातील कामकाजही श्री. रामू म्हातंग पटेल, राज्यमंत्री यांच्याकडे नेमून देत आहेत आणि त्या प्रयोजनासाठी शासकीय अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरओबी. ११७८/अठरा (ओ.ॲण्ड एम.)/(२), दिनांक १२ मार्च १९७८ यात पुढीलप्रमाणे सुधारणा करीत आहेत.

उक्त अधिसूचनेत श्री. रामू म्हातंग पटेल यांच्या संबंधातील नोंदीपुढे "पाटबंधारे, समाजकल्याण" या शब्दानंतर "आदिवासी विकास" हे शब्द दाखल करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ब. कडई

सचिव.

**६) पृष्ठांकनाचा नमुना -**

**सोबत -------यांच्या--------या संबंधीच्या दिनांक------च्या---- ------ची प्रत**

क्रमांक --------

जिल्हाधिकारी कार्यालय--------

राजवाडा चौक-------

दिनांक ------------

खालील अधिका-यांकडे माहितीसाठी / आवश्यक कार्यवाहीसाठी / अभिप्रायासाठी / निकालात काढण्यासाठी पाठविण्यात येत आहे.

सही/--

जिल्हाधिकारी-------करिता

**पृष्ठांकनाचा नमुना (पहिला प्रकार)**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

श्री. शिवदास नाईक,<br>
मुक्काम परहूरपाडा, पोस्ट - कामार्ले,<br>
तालुका- अलिबाग, जिल्हा- रायगड<br>
पिन क्रमांक -------------------

**विषय** :- प्राथमिक आरोग्य केंद्र पोयनाड<br>
औषधांचा अपुरा पुरवठा.

महोदय,

आपण वरील विषयाबाबत दिनांक २५ फेब्रुवारी १९८९ चे मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांस लिहीलेले पत्र, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, अलिबाग यांजकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात येत आहे. आपण याबाबत पुढील पत्रव्यवहार संबंधित अधिका-यांशी परस्पर करावा अशी विनंती आहे.

आपला विश्वास,

(अ. ब. कडई)

प्रत - मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, अलिबाग यांना दिनांक २७ फेब्रुवारी १९८९ च्या मूळ अर्जासह योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

याबाबत अर्जदारास उत्तर परस्पर देण्यात यावे.

====================================================

दुस-या प्रकारच्या पृष्ठांकनाचा वापर केंद्र सरकारच्या किंवा इतर विभागांच्या परिपत्रकांच्या किंवा आदेशांच्या प्रती तसेच पत्रे यांच्या प्रती माहितीसाठी किंवा आवश्यक कार्यवाहीसाठी पाठविण्याकरिता केला जातो, यात सही शेवटी असत नाही. याही पृष्ठांकनाची भाषा तृतीय पुरुषी असते. पृष्ठांकनाचा एक नमुना पुढे दिला आहे.

**- पृष्ठांकनाच्या दुस-या प्रकारचा नमुना**

[सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक एमआयएस १०८०/१७०/१८ (र व का) दिनांक ११ ऑगष्ट १९८१ च्या आमदार/खासदार यांना जनतेच्या गा-हाण्यासंबंधात अधिकारी वर्गाची भेट घेण्यासंबंधीच्या परिपत्रकाची प्रत]

पहावे .- (१) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीएमः १०८३-एलसी दिनांक २५ मे १९७३.

(२) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीएमएः १०७८/११३४/३/ दिनांक १२ ऑक्टोबर १९७८.

जनतेच्या गा-हाण्यासंबंधात त्वरित निर्णय घेण्यात यावा यासाठी ब-याचवेळा आमदार/ खासदार यांना शासकीय कार्यालयातील निरनिराळ्या स्तरावरिल अधिका-यांची भेट घ्यावी लागते. सदर आमदार/खासदार यांना सर्वतोपरी सहकार्य देऊन त्यांनी निदर्शनास आणलेल्या जनतेच्या गा-हाण्याबाबत त्वरीत उचित कार्यवाही सुरू करावी असे आदेश सर्व शासकीय कार्यालयांना देण्यात येत आहेत.

---------------------------------------------------------------------------

क्रमांक : एमआयएस १०८१/५४७२/१९
महसूल व वन विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक

महसूल व वन विभागातील सर्व उप सचिव, विभागीय अधिकारी, अवर सचिव, कार्यासन अधिकारी यांना माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित.

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**पृष्ठांकनाच्या दुस-या प्रकारचा आणखी एक नमुना**

सोबत सामान्य प्रशासन विभागाचे क्रमांक एमआयएस-१०८१/६२०८/१९, दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ चे टिपण्या व पत्र लेखनामध्ये सोप्या व सुटसुटीत भाषेचा वापर करण्यासंबंधीचे पृष्ठांकन.)

क्रमांक : एमआयएस १०८१/७६२/१७
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २३ ऑक्टोबर १९८१.

श्री. ------------------------- अवर सचिव, नगर विकास व आरोग्य विभाग यांच्याकडे माहितीसाठी व प्रशिक्षणार्थींना आवश्यक मार्गदर्शन करण्यासाठी अग्रेषित.

( अ. ब. कडई )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

पृष्ठांकन दोन प्रकारचे असते. पृष्ठांकनाचा वापर पत्र अर्ज निवेदने यांच्या प्रती माहितीसाठी / अभिप्रायासाठी पाठविण्याकरिता केला जातो. पृष्ठांकनाची भाषा तृतीय पुरुषी असते. पृष्ठांकन करतांना कोणत्या विशिष्ट सूचना दिल्या असल्यास त्यावर अधिका-यांची स्वाक्षरी पदनामासह घेण्यात येते.

**७) शिघ्र पत्राचा नमुना**

**अतितात्काळ**

क्रमांक --------
जिल्हाधिकारी कार्यालय--------
राजवाडा चौक-------
दिनांक ------------

प्रति
तहसिलदार------------------

विषय :----
संदर्भ :-----

मजकूर

सही/-
जिल्हाधिकारी-------

**८)-तारेचा नमुना**

प्रति,
तहसिलदार----------

संदर्भ --------दिनांक---------पहावा (.) माहिती ताबडतोब पाठवावी (.)

जिल्हाधिकारी

-----------------------------------------------------------------------------प्रत पोष्टाने

क्रमांक

जिल्हाधिकारी कार्यालय
राजवाडा चौक--------
दिनांक ---------

**तहसिलदार, ----------यांना या संदर्भाने मागविलेली माहिती तात्काळ सादर करावी.  शासनास सदरची माहिती ताबडतोब सादर करावयाची आहे.**

सही/-

जिल्हाधिकारी,------करिता

**शासकीय तारेचा एक नमुना**

---------------------------------------------------------------------------

राज्य तातडीची तार

प्रति,
डॉ. सु. रा. चव्हाण,
जिल्हा शल्य चिकित्सक
जिल्हा रूग्णालय, नाशिक.

क्रमांक एचएसपी १०९०/सीआर १८५/आरोग्य (३)(-) जिल्हा रूग्णालयात अपघात कक्ष स्थापन करण्यासाठी लागणा-या अनावर्ती व आवर्ती खर्चाचा आपल्याकडून मागविलेला तपशिल खास दूताबरोबर तात्काळ पाठवावा (.)

महाहेल्थ

---

तारेत अंतर्भूत करु नये.

(श्री. मा. शहाणे)
अवर सचिव,
सार्वजनिक आरोग्य विभाग.

---

क्रमांक : एचएसपी १०८०/सीआर-१८५/आरोग्य-३
सार्वजनिक आरोग्य विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक

प्रत पोस्टाने -  डॉ. सु. रा. चव्हाण,  जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, नाशिक यांस अग्रेषित. वरील तपशिल मुदतीपूर्वी न आल्यास प्रस्तावास मंजूरी मिळणार नाही. तरी तपशिल तात्काळ पाठविण्याची व्यवस्था करावी.

(श्री. मा. शहाणे)
अवर सचिव,
सार्वजनिक आरोग्य विभाग.

**९) अर्ध शासकीय पत्राचा नमुना -**

पत्र पाठविणा-या
अधिका-याचे नांव व पदनाम

अ. शा. प.क्रमांक
जिल्हाधिकारी कार्यालय
राजवाडा चौक--------
दिनांक ---------

विषय :------
संदर्भ -----

प्रिय श्री ---------

( पत्राचा मजकूर )

आपला -----
सही /--
(अ ब क)

प्रति,
श्री. अबक
(ज्या अधिका-याला पत्र पाठवावायाचे आहे त्यांचे नांव व पदनाम)

**अर्धशासकीय पत्राचा नमुना**

अ.शा.पत्र क्रमांक : इएसटी १२८०/२८४-का-१७
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक

अ. ब. पाटील
उप सचिव.

**विषय** :- ज्येष्ठता सूचीकरिता नवीन सूत्रे.

प्रिय श्री. नाईक,

कृपया वरील विषयावरील या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक १ डिसेंबर १९८८ चे पत्र व त्यानंतरची स्मरणपत्रे पहावीत.

२. या विषयावरील आपल्या कार्यालयाचा अहवाल अजूनही आलेला नाही. मुख्य सचिवांचे असे आदेश आहेत की वरील वरील विषयावर येत्या १० दिवसात मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी टिप्पणी पाठवावी.

३. तेंव्हा आपण या प्रकरणी जातीने लक्ष पुरवून आपला अहवाल येत्या तीन दिवसांत म्हणजे दिनांक १० जानेवारी १९८९ पर्यंत पाठवावा अशी मी विनंती करतो. या प्रकरणी काही स्पष्टीकरण हवे असल्यास कृपया दूरध्वनी क्रमांक ----------- वर माझ्याशी संपर्क साधावा.

शुभेच्छा

आपला स्नेहाकित,

(अ. ब. पाटील)

श्री. शिवदास नाईक,
संचालक ---------------------------------------------- पुणे.

**१०) - कार्यालयीन आदेश**

क्रमांक

जिल्हाधिकारी कार्यालय-----

राजवाडा चौक----------

दिनांक----------

**कार्यालयीन आदेश**

मजकूर

सही /-

जिल्हाधिकारी -----

प्रति,

शाखा प्रमुख ( सर्व )

लेखा शाखा

निवड नस्ती

**(कार्यालयीन आदेशाचा नमुना)**

**कामाचे विवरणपत्र सहाय्यकांनी ठेवण्याबाबत..**

कर्यालयीन आदेश

क्रमांक. ६४५/डीआरएस १०८०/का -

सार्वजनिक बांधकाम विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक

सध्याची कार्यासन पध्दती अस्तित्वात आली त्यावेळी सहाय्यकांनी केलेल्या कामाची विवरणपत्रे ठेवण्याची पध्दत बंद करण्यात आली होती.

२. सचिव (A. R. and O. & M.) सामान्य प्रशासन विभाग यांच्याशी सर्व मंत्रालय विभागातील उप सचिवांची दिनांक १८ ऑगष्ट १९८० रोजी जी बैठक झाली त्यामध्ये असे ठरले की, यापुढे प्रत्येक सहाय्यकाने आपण केलेल्या कामाची विवरणपत्रे ठेवावी.

३. वरील निर्णयानुसार असा आदेश देण्यात येत आहें की, दिनांक १ सप्टेबर १९८० पासून प्रत्येक सहाय्यकाने आपल्या कामाची विवरणपत्रे विहित नमुन्यात ठेवावी. कार्यविवरण नोंदवहया थोडयाच उपलब्ध असल्यामुळे ज्या सहाय्यकाकडे त्यांच्या पूर्वीच्या कार्यविवरण नोंदवहया नसतील त्यांच्यासाठीच नवीन वहया नोंदणी शाखेतून घ्याव्यात. कार्यासन अधिका-यांनीसुध्दां त्यांनी व्यक्तीश: केलेल्या प्रकरणांची कार्यविवरण नोंदवही ठेवणे आवश्यक आहे

४. त्याचप्रमाणे प्रतिक्षाधीन ठेवण्यात येत असलेल्या प्रकरणांबाबत अशी प्रकरणे संबंधित सहाय्यकाकडे ठेवण्याची सध्याची पध्दत बंद करून सर्व प्रतिक्षाधीन प्रकरणे एकत्र ठेवावीत. आणि प्रतिक्षाधीन ठेवण्याच्या तारखेनुसार त्यांची नोंद एका वहीत घ्यावी. प्रतीक्षाधीन ठेवण्याचा काल संपताच अशी सर्व प्रकरणे कार्यासन अधिका-याकडे द्यावीत आणि कार्यासन अधिका-याने ती प्रकरणे स्मरणपत्रे पाठविण्यासाठी संबंधित सहाय्यकाकडे सूपूर्द करावीत. स्मरणपत्रांसाठी वा पुन्हां टिप्पणी करण्यासाठी जी

प्रकरणे सहाय्यकाकडे दिली जातील त्याची नोंद त्या दिनांकास सहाय्यकाने आपल्या कामाच्या विवरणपत्रामध्ये घेणे आवश्यक आहे.

वरील आदेशाची अंमलबजावणी अत्यंत काटेकोरपणे केली जावी.

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व कार्यासन अधिकारी आणि शाखा प्रमुख यांना योग्य त्या अंमलबजावणीसाठी.

सर्व पर्यवेक्षक अधिका-यांना माहितीसाठी.

**११) प्रसिध्दी पत्रव्यवहाराचा नमुना**

महाराष्टू शासन

------विभाग, मंत्रालय, मुंबई

क्रमांक -----------

दिनांक---------

**प्रसिध्दी पत्रक**

विषय----

मजकूर------

सही/--

सचिव -------- विभाग

**१२) अनौपचारिक संदर्भाचा नमुना -**

क्रमांक

जिल्हाधिकारी कार्यालय-----

राजवाडा चौक----------

दिनांक----------

--------------या शाखेचा ----------------------- या विषयासंबंधीचा

दिनांक----------------------------चा संदर्भ पहावा.

मजकूर

संबंधित फाईल सोबत आहे.

सही/--

निवासी उप जिल्हाधिकारी---

जिल्हाधिकारी कार्यालय ----------------- शाखेकडे अनौपचारिक संदर्भाने कार्यवाहीसाठी

**कार्यवृत्ताचा नमुना**

**बैठकीचे नांव व दिनांक**

--------- करीता संबंधित आधिका-यांची बैठक -------- मध्ये घेण्यात आली त्या बैठकीस खालीलप्रमाणे अधिकारी उपस्थित होते.

१. मा. श्री.
२. मा. श्री.

**बैठकीमधील कामकाजाची माहिती**

त्यानंतर बैठकीचे कामकाज संपल्याचे सांगण्यात आले.

सही/- सही/-

बैठकीचे सचिव बैठकीचे अध्यक्ष

# त्रिअक्षरी क्रमांक पध्दत

प्रत्येक नस्तीला व त्या नस्तीवरुन केलेल्या पत्रव्यवहाराला पुढील संदर्भासाठी क्रमांक देणे अत्यंत आवश्यक असते. त्या नस्तीवरुन केलेल्या पत्रव्यवहाराला आलेली उत्तरे पूर्वीच्या पत्रव्यवहाराला जोडण्यासाठी याची आवश्यकता असते. एका नस्तीवरुन पाठविलेल्या सर्व पत्रांना त्या नस्तीचा एकच क्रमांक दिला जातो. यामुळे त्या नस्तीवरुन पाठविलेल्या सर्व पत्रांची उत्तरे त्या नस्तीला जोडता येतात.

१. मंत्रालयात नस्तींना क्रमांक देण्याच्या अनेक पध्दती यापूर्वी अस्तित्वात होत्या. कामाच्या प्रचंड ओघामुळे नस्ती क्रमांक देण्याचे हे काम विकेंद्रीत करुन कामाला गती आणणेसुध्दां जरूर होते. याकरीता सचिवांची एक समिती नेमली गेली त्यांनी इबकॉन यांनी सूचविलेली पध्दत अस्विकृत करुन एक नवीन पध्दत सूचविली. त्यास "त्रिअक्षरी क्रमांक पध्दत" म्हणतात. ही पध्दत सुमारे १९५१-५२ पासून मंत्रालयात सुरु करण्यात आली.

२. या पध्दतीमध्ये पहिली तीन अक्षरे ही स्थूलमानाने मुख्य विषय थोडक्यात सूचित करणारी असतात. त्यानंतर चार अंकी संख्या असते. यातील पहिले दोन अंक म्हणजे १० ते ९९ हे त्या मुख्य विषयाचा उप विषय सूचिम करतात. तर शेवटचे दोन क्रमांक ज्या वर्षी ती नस्ती सुरु होते ते वर्ष सूचित करतात. उदा. "रोहयो १२८८" हा क्रमांक रोजगार हमी योजना या मुख्य विषयावरील एका उप विषयावरील नस्ती असून ही नस्ती १९८८ साली उघडली गेली हे स्पष्ट करतो. चार अंकानंतर त्या नस्तीमध्ये आलेल्या पहिल्या संदर्भावरील नोंदणी शाखेने दिलेला आवक क्रमांक लिहीण्याची पध्दत होती. आता अनेक ठिकाणी या ऐवजी प्रकरण क्रमांक (Case No.) लिहीला जातो. कांही ठिकाणी दोन्ही लिहीले जातात. त्यानंतर कार्यासनाचा किंवा शाखेचा क्रमांक लिहीला जातो. या पध्दतीत नस्ती क्रमांक पाहून विषय, उप विषय, त्या नस्तीच्या सुरुवातीचे वर्ष, केस क्रमांक व कार्यासन हे सर्व लक्षात येते. इंडेक्स कार्डावरुन किंवा नस्तीच्या नोंदणी वहीवरुन (Case Register) ताबडतोब नस्ती शोधता येते. या पध्दतीत पहिली तील अक्षरे आलटून पालटून वापरण्याला मोठया प्रमाणावर वाव आहे. त्याचप्रमाणे फाईलचे संकलन करणेसुध्दां सोपे जाते.

३. ही पध्दत यशस्वीपणे राबविण्यासाठी प्रत्येक कार्यासन अधिका-याने आपल्या कार्यासनात हाताळल्या जाणा-या सर्व प्रमुख विषयांची प्रथम एक यादी तयार करुन त्यासाठी "त्रिअक्षरी" सूची तयार करुन त्यास मान्यता घ्यावी व नंतर ती सर्व सहाय्यक व लिपिक यांना देऊन त्याप्रमाणे विषयवार नस्ती क्रमांक दिले जात आहेत हे पाहावे. त्याचप्रमाणे पहिल्या तीन अक्षरानंतर जी चार अंकी संख्या असते त्यातील पहिले दोन अंक म्हणजे १० ते ९९ त्या विषयाच्या सर्व उप विषयांना प्रथम वाटून द्यावेत. यातील पहिले दोन तीन अंक म्हणजे १०, ११, १२ (आवश्यकतेनुसार १५ पर्यंत) त्या विषयावरील महत्वाच्या धोरणविषयक उप विषयांना राखून ठेवावेत. ज्या ठिकाणी क्षेत्रीय आधारावर नस्ती उघडल्या जातात तेथे क्षेत्रीय आधारावर किंवा किंवा जिल्हावार वाटून दिल्यास एखाद्या विशिष्ट जिल्हयातील प्राथमिक आरोग्य केंद्राच्याबाबत नस्ती मिळणे सोपे जाईल.

# फाईल पध्दती

नस्तीचे दोन विभाग पडतात. नस्तीच्या सुरुवातीला निर्देशपत्र लावून त्यानंतर टिप्पणी विभाग, मध्ये पृथकपत्र, त्यानंतर पत्रव्यवहार विभाग अशी रचना करून टिप्पणी विभाग व पत्रव्यवहार विभाग यांना वेगवेगळे पृष्ठ क्रमांक देतात (त्या दोन्हींना दोन निराळे बंद (tags) लावून ते दोन्ही पृथकपत्राशी जोडतात). या पृष्ठांचा उल्लेख टिपणी विभाग -टि.वि. व पत्रव्यवहार विभाग- प. वि. असा करतात. असे दोन भाग पाडण्याचा उद्देश एकूण प्रकरणातील मुद्दे टिपणीमध्ये परत परत लिहावे लागू नयेत. टिप्पणीमध्ये सातत्य रहावे, मागील टिप्पणी व त्यावरील आदेश पाहून एकूण प्रकरण लवकर समजावे व पुढील निर्णय घेणे सुलभ जावे असा आहे. त्याचप्रमाणे पत्रव्यवहार हा एका बाजूला येण्याने महत्वाची पत्रे स्पष्टपणे नजरेत येतात व पत्रव्यवहाराचा क्रम व्यवस्थित लक्षात येतो. अनौपचारीक संदर्भ हे टिप्पणी विभागात लिहीतात. अर्धशासकीय पत्रे, तारा वगैरे पत्रव्यवहार विभागात ठेवतात. नस्तीवरील सर्व कागद हे बंदाव्दारे/ ओवून ठेवावेत, मोकळे ठेऊ नयेत.

**पृष्ठ क्रमांक देणे**

संचिका सादर करण्यापूर्वी त्यामध्ये आवश्यक ते कागदपत्र जोडून टिपणी पृष्ठ क्रमांक व पत्रव्यवहार पृष्ठ क्रमांक व्यवस्थितपणे पृष्ठांवर नमूद केलेले असावेत असे पृष्ठ क्रमांक नमूद करूनच संचिका सादर करावी. यामध्ये टिप्पणीच्या (Noting) भागाकरीता N-1, N3 याप्रमाणे तर पत्रव्यवहाराकरीता (Correspondance) C-1, C-3, C-5 याप्रमाणे देण्यात यावेत.

# सहा संच पध्दती

**१. उद्दिष्टे :**

दैनंदिन कामकाज करतांना कर्मचाऱ्याने टपालामधुन येणाऱ्या अगर प्रत्यक्ष हाती दिलेल्या पत्रांवर कार्यवाही वेळीच करणे अपेक्षित असते. प्राप्त संदर्भावर कालमानक्रमानुसार कार्यवाही करावी लागते. कामकाजामध्ये सूसूत्रता यावी, प्रशासन यंत्रणा गतीमान व कार्यक्षम करण्यासाठी लिपिकाचे दप्तर अद्ययावत ठेवणे गरजेचे असते. यासाठी सर्व कामे वेळेवर पूर्ण करणे अपेक्षित असते.

| | | |
|---|---|---|
| १ | कार्यविवरण पत्र | Worksheet |
| २ | प्रतिक्षाधिन प्रकरणे | Await |
| ३ | नियतकालीके | Periodicals |
| ४ | स्थायी आदेश संचिका | Standing Order file |
| ५ | अभिलेख कक्षात पाठवावयाच्या संचिका | Files kept ready for record room |
| ६ | नाश करावयाची कागदपत्रे | D-Papers |

**सहा संच पध्दतीच्या अंमलबजावणीसाठी कार्यपध्दती:**

१) **कार्यविवरण पत्र :**

प्रत्येक सेवकाने कार्यविवरणपत्र विहीत करण्यात आलेल्या प्रपत्रात ठेवणे आवश्यक आहे.

**कार्यविवरणपत्र नोंदवही**

**नाव** **हुददा**

| अ. क्र. | पत्र प्राप्त दिनांक | नस्ती क्र. आवक क्र | कार्यवाहीखालील विषय | प्रकरण कोणास सादर केले व कोणत्या दिनांकास | शेरे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |

कार्यविवरण पत्र लिहीण्यामध्ये नियमितपणा असावा. कार्यविवरण पत्र बाईंड केलेले असावे. पृष्ठांकन केलेले असावे. कार्यविवरण पत्राचा कालावधी १ जानेवारी ते ३१ डिसेंबर असा असतो कार्यविवरण पत्रातील सर्व स्तंभामध्ये प्राप्त संदर्भाची नोंद सेवकाने करावी. कार्यविवरण पत्र नियमित लिहीतांना प्रत्येक दिवसाची तारीख नमूद करुन संदर्भ लिहावेत.

अखेरीस साप्ताहीक गोषवाऱ्याची आवश्यक त्या प्रमाणात विहीत प्रपत्रे असावीत. विहीत नमुन्यात सेवकाने कार्यविवरणपत्राचा दर सोमवारी साप्ताहीक गोषवारा काढावा. प्रलंबित संदर्भ निकाली काढण्यासाठी प्राधान्य देण्यात यावे. साप्ताहीक गोषवारा वरीष्ठांकडे दर सोमवारी अवलोकनार्थ सादर करण्यात यावा. कार्यालयात पर्यवेक्षक पदावर काम करणाऱ्या सेवकाने सर्व लिपिकांच्या गाोषवाऱ्याची सांख्यिकी माहिती एकत्रित करुन एका प्रपत्रात एकत्रिकरण तक्ता वरीष्ठांचे अवलोकनार्थ सादर करावा. यामध्ये सातत्य राखणे आवश्यक असते. दिर्घकालीन प्रलंबित संदर्भ निकाली काढण्यासाठी लक्ष केंद्रीत करण्यात यावे. या पध्दतीमध्ये नियमितपणा असावा त्यामुळे कार्यालयातील प्राप्त संदर्भावर केलेल्या कार्यवाहीची विभागानुसार माहिती तात्काळ उपलब्ध होते.

**आठवडा आढावा**

**नोंदवही ७. कार्यविवरण पत्राचा साप्ताहिक गोषवारा.**

नाव आणि पद - - - - सप्ताह - - - अखेरचा अहवाल

१ - प्रलंबित पत्रे / मागच्या आठवडयातील संदर्भासह

२ - आठवडयात आलेली पत्रे

३ - एकूण पत्रे

४ - उत्तर पाठविलेली पत्रे

५ - नियतकालानुसार प्रलंबित पत्रे

- एक आठवडयापर्यंत
- दोन आठवडयापर्यंत
- तीन आठवडयापर्यंत
- त्यापेक्षा जास्त

६ - प्रलंबित पत्रे / संदर्भ यांचे वर्गीकरण

- राज्य/केंद्र शासन
- अशासकीय संस्था - महामंडळअंतर्गत

२) **प्रतिक्षाधिन प्रकरणे :-** सर्व लिपिकांनी प्रतिक्षाधीन प्रकरणांची नोंदवही विहित नमुन्यात ठेवावी. दर सोमवारी प्रतिक्षाधिन प्रकरणांचा गोषवारा काढण्यात यावा. शिलकी प्रकरणे निकाली काढण्याच्या दृष्टीने सातत्याने पाठपुरावा करण्यात यावा. प्रतिक्षाधिन प्रकरणे एकत्रितरित्या ठेवण्यात यावीत.

३) **नियतकालीके.**

नियतकालीकांमध्ये दोन प्रकार आहेत. 'अ' आणि 'ब'.

**१) प्रकार 'अ':** ज्या कार्यालयाने नियतकालीक निश्चित केले आहे त्या कार्यालयाचे नांव, विवरणपत्र विहित केलेल्या पत्राचा संदर्भ, विवरणपत्राचा विषय, विवरणपत्र सादर करण्याचा अंतिम दिनांक या बाबी अंतर्भूत असणा-या विहित नमुन्यात माहिती तयार करावी.

सदर माहिती तयार करतांना नियतकालीकाच्या कालावधीनुसार साप्ताहीक, पाक्षिक, मासिक, द्वैमासिक, त्रैमासिक, सहामाही व वार्षिक या क्रमानुसार सर्व नियतकालीकांचा समावेश नोदवहीमध्ये करावा. त्याप्रमाणे संबंधित कार्यालयाकरीता जी नियतकालीके निश्चित करण्यात आली असतील अशा सर्व नियतकालीकाबाबतची माहिती त्यामध्ये समाविष्ट करणे अपेक्षित असून ती माहिती दरवर्षी वर्षाच्या सुरुवातीला अद्यावत करणे आवश्यक आहे.

**नोंदवही - नियतकालिक विवरण सादर करण्याचा तपशिल (पी. आर. ए.)**

| अ.क्र | नियतकालिक विवरणाचा विषय | विवरणपत्र विहित केलेल्या | | विवरणपत्र कोणास सादर करावयाचे | विवरणपत्र सादर करण्याचा अंतिम दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| | | अधि-का-याचा हुद्या | पत्राचा संदर्भ क्रमांक | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |

२) **प्रकार 'ब' :** या नोंदवहीमध्ये नियतकालीक निश्चित केलेल्या कार्यालयास पाठविल्याचा दिनांक व त्याच्या तपशिलाची नोंद करणे अपेक्षित आहे. या नोंदवहीमध्ये नियतकालीकनिहाय खालीलप्रमाणे माहिती असणे अपेक्षित आहे.

**नोंदवही - नियतकालीक विवरणाचे सादरीकरण प्रपत्र - (पी. आर. बी.)**

**विवरणपत्राचे नांव :-**

| अ. क्र. | महिना | सादर करण्याचा विहित दिनांक | प्रत्यक्ष सादर केल्याचा दिनांक | सही | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

वर्षाच्या सुरुवातीला उपरोक्त नमुन्यामध्ये नियतकालीकाच्या कालावधीनुसार साप्ताहीक, पाक्षिक, मासिक, द्वैमासिक, त्रैमासिक, सहामाही व वार्षिक या क्रमानुसार सर्व नियतकालीकांचा समावेश नोदवहीमध्ये करावा व त्यामधील रकाना १ ते ३ ची माहिती सुरुवातीलाच भरुन ठेवावी व नियतकालीक प्रत्यक्ष सादर केल्यानंतर त्याबाबतचा तपशिल रकाना ४ मध्ये लिहून संबंधित अधिका-याची स्वाक्षरी घ्यावी.

**४) स्थायी आदेश संचिका:**

शासन निर्णय, शासन परिपत्रक, महत्वाच्या सूचना, आदेश यांचा अंतर्भाव यामध्ये असतो. त्यानुसार प्रत्येक कार्यालयात विषयनिहाय स्थायी आदेश संचिका ठेवणे आवश्यक आहे. स्थायी आदेश संचिकेमध्ये समाविष्ट असलेल्या आदेशाचे क्रमांक - दिनांक - विषय अनुक्रमणिकेमध्ये लिहावेत. स्थायी आदेश संचिकेच्या प्रारंभी अनुक्रमणिका असावी. स्थायी आदेश संचिकेत शासन निर्णय/ आदेश समाविष्ट केल्यास तात्काळ त्याची नोंद अनुक्रमणिकेत करावी. कार्यालयात लिपिक निहाय स्थायी आदेश संचिकांची सुची तयार करण्यात यावी. ही सुची कार्यालयाच्या पर्यवेक्षकांकडे असावी. स्थायी आदेश संचिकेत समाविष्ट असणाऱ्या आदेशांना पृष्ठांकन करण्यात यावेत. सर्व स्थायी आदेश संचिका कार्यालयात एकत्रित व सुरक्षित ठेवण्यात याव्यात. कार्यालयातील प्रत्येक स्थायी आदेश संचिकेला सलग क्रमांक देण्यात यावेत व तेच क्रमांक सुचीमध्ये अंतर्भुत असावेत.

**५) अभिलेख कक्षात पाठवावयाच्या संचिका:**

अभिलेख वर्गीकरण - परिरक्षण व नाश नियमानुसार वर्गीकरण करावे. विहीत प्रकारात (अ, ब, क, क-१, ड) सुचीनुसार विषयनिहाय संचिका ठेवाव्यात.

**नोंदवही - वर्गीकरण केलेल्या नस्तीचे अभिलेख विभागात स्थलांतर करणे.**

१) शाखा /विभागाचे नांव २) वर्ष

| अ. क्र. | नस्ती क्र. | विषय | नस्ती दिनांक | | नस्ती बंद करताना त्यातील पृष्ठे | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | प्रारंभ | अखेर | टिप्पणी भाग | पत्रव्यवहार भाग |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

| नस्तीचे वर्गीकरण | नस्ती नष्ट करण्याचा दिनांक | व्यक्तीची सही व दिनांक | | शेरा |
|---|---|---|---|---|
| | | नस्ती पाठविणे संबंधात | नस्ती मिळणे संबंधात | |
| ८ | ९ | १० | ११ | १२ |

**६) नाश करावयाची कागदपत्रे**

नाश करावयाच्या सर्व कागदपत्रांची यादी करून त्यास संबंधित अधिका-यांची मान्यता घेऊन त्यानंतरच ती विहित पध्दती अवलंबून नाश करणे अपेक्षित आहे.

# अभिलेख वर्गीकरण

**उद्देश :-**

प्रत्येक कार्यालयात दररोज अनेक प्रकारे कागदपत्रांची आवक होत असते व त्या कागदपत्रांना अनुसरुन कार्यालयातील कामकाज चालते. त्याप्रमाणे कार्यालयाच्या विविध विभागातील विषयांच्या संचिका त्या विषयाबाबत निर्णय होऊन त्यावरील कार्यवाही पूर्ण होते. अशाप्रकारे कागदपत्रांची संख्या वाढल्यानंतर ते नीट न ठेवल्यास त्यामधील नेमकी कागदपत्रे कामाच्यावेळी लवकर उपलब्ध होत नाहीत किंवा उपलब्धच होत नाहीत. त्यामुळे निर्णय घेण्यामध्ये अडचणी निर्माण होतात. त्याकरीता आपल्या कार्यालयाचे अभिलेख हे व्यवस्थिपणे ठेवले जाणे अत्यंत गरजेचे आहे. त्याची मुख्य उद्दिष्टे पुढीलप्रमाणे आहेत.

- कागदपत्रांची जपणूक व्हावी.
- कागदपत्रे तातडीने उपलब्ध व्हावीत.
- अनावश्यक कागदपत्रांची अडचण कमी व्हावी.
- त्याशिवाय माहितीचा अधिकार कायदा २००५ पासून अंमलात आला आहे, त्याखाली माहिती मागविण्याचा अधिकार प्रत्येक भारतीयांस मिळाला आहे. त्याचा वापर मोठया प्रमाणात सुरु आहे. अशावेळी आवश्यक ते कागदपत्र तातडीने उपलब्ध होणे जरुर आहे. त्यासाठी अभिलेख वर्गीकरण करणे अत्यंत आवश्यक आहे.

शासकीय कार्यालयामध्ये सर्वात जास्त महत्व असते ते अभिलेखास. नेहमीचा प्रचलित शब्द वापरला जातो तो म्हणजे "कागद बोलतात" यामुळेच हे कागद अत्यंत व्यवस्थित ठेवणे, जपून ठेवणे महत्वाचे ठरते. यासाठी एक विविक्षित पध्दती ठरवून देण्यात आली आहे. त्या पध्दतीचे काटेकोर पालन केल्यास अभिलेखांमधून विनाविलंब माहिती काढणे सहज शक्य होते.

**कार्यपध्दती**

**१. अभिलेखाचे जतन :-**

अभिलेखाचे जतन करण्यासाठी शासनाच्या विविध प्रशासकीय विभागांकडून त्यांच्या विभागातील कामकाजाला अनुसरुन कोणत्या संचिका किती वर्षे जतन कराव्यात याबाबत वेळोवळी आदेश दिलेले आहेत. त्या सूचना विचारात घेऊन कागदपत्रांचे वर्गीकरण करावयाचे आहे. याबाबतीत संचिका जतन करण्याबाबत सर्वसाधारणपणे त्याचे प्रकार व कालावधी पुढीलप्रमाणे आहे.

| अभिलेख प्रकार | रुमालाचा रंग | संचिका जतन करावयाचा कालावधी |
|---|---|---|
| अ | लाल | कायम स्वरुपी |
| ब | हिरवा | ३० वर्षे |
| क | पिवळा | १० वर्षे |
| क-१ | पांढरा | ५ वर्षे |
| ड | पांढरा | १ वर्षे |

**२. वर्गीकरण कार्यपध्दती**

१. अभिलेख वर्गीकरण कामकाज ही सतत चालणारी प्रक्रीया आहे. त्या प्रक्रीयेत खंड पडणार नाही याची काळजी घ्यावी.

२. दर वर्षी  साधारणपणे आर्थिक वर्ष संपल्यानंतर १५ एप्रिल ते १५ मे या कालावधीत अभिलेख वर्गीकरणाचे काम हाती घेऊन पूर्ण करावे.

**३. संचिकांची निंदणी, वर्गीकरण**

संचिकांची निंदणी, वर्गीकरण याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

- ज्या संचिकांचे कामकाज पूर्ण झाले असेल अशा संचिकांचे वर्गीकरण करून पुढील कार्यवाही करण्याबाबत कार्यालय प्रमुख/सक्षम अधिका-यांचे आदेश प्राप्त करून घेण्यात यावेत व याप्रमाणे फक्त आदेश प्राप्त करून घेण्यात आलेल्या संचिकांचे वर्गीकरण करण्याचे काम हाती घ्यावे.
- त्यानंतर वरीलपैकी ज्या संचिकांचे यापूर्वी अंशत: वर्गीकरण केलेले असेल किंवा अजिबात वर्गीकरण केलेले नसेल अशा संचिकांचे वर्गीकरण निश्चित करून घेण्यात यावे. याबाबतीत कार्यालय प्रमुखांचेवतीने विषयांचे वर्गीकरण करून संचिका अभिलेखाच्या कोणत्या प्रकारात जतन करावयाच्या याबाबत खात्याने प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शनपर सुचीला अनुसरुन संचिकांचे वर्गीकरण केले जाते. त्यासाठी आपल्या विभागाची मार्गदर्शनपर सुची व्यवस्थित अभ्यासणे आवश्यक आहे
- संचिकेमधील अनावश्यक कागदपत्रे (कोरे कागद, अनावश्यक कागद, जादा प्रती) त्यामधून बाजूला काढून संचिकेतील पानाना सलग पान नंबर देण्यात यावेत.
- संचिकेच्या कव्हर पेजवर संचिकेचा विषय, संचिकेचा वर्गीकरण (अ, ब, क, क१, ड) प्रकार,  पृष्ठ संख्या, संचिका सुरु केल्याचा दिनांक व बंद केल्याचा दिनांक  असा तपशिल लिहावा.

**४. अभिलेखाची यादी तयार करणे**

संचिकांची यादी करण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

- वर्गीकरण केलेल्या सर्व संचिकांची प्रकारनिहाय (अ, ब, क, क१, ड) यादी तयार करण्यात यावी. ती यादी खालीप्रमाणे असावी.

**कार्यालयाचे नांव :-**

**यादी तयार केल्याचा दिनांक :-**

| गठठा क्रमांक | फाईलअ.क्र. | विषय | वर्गीकरण प्रकार | एकूण पृष्ठे | संचिका सुरु केल्याचा दिनांक | संचिका बंद केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

- वरीलप्रमाणे तयार केलल्या संचिकेची एक यादी कार्यालयाचे अधिक्षक यांच्याकडे देण्यात यावी.
- जतन करावयाच्या संचिका अ, ब, क, क१ अशा वर्गीकरण प्रकारानुसार  वेगवेगळया रंगाच्या कापडाच्या गठठयात बांधाव्यात. त्या प्रत्येक गठठयात कोणत्या संचिका आहेत त्याची यादी त्या गठठयात वर ठेवावी प्रत्येक रंगाच्या रुमालांना चढत्या पध्दतीनुसार क्रमांक देवून त्यामध्ये समाविष्ट असलेल्या संचिकांच्या विषयाच्या शिर्षकासह यादी तयार करावी. याप्रमाणे प्रकारनिहाय किती

नंबरच्या गठठयात कोणत्या संचिका आहेत त्याबाबतच्या यादीची एक प्रत कार्यालयीन अधिक्षक यांच्याकडे देण्यात यावी. संचिकांच्या विषयाची कार्डावर यादी करुन लावावी.

- जतन करावाच्या संचिकांची यादी व त्यासबंधित संचिका अभिलेख कक्षाकडे जतन करण्यासाठी पाठविण्यात याव्यात.

## (५) अभिलेख कक्ष :-

योग्य प्रकारे संचिकांचे वर्गीकरण करुन त्याची यादी निर्णयासाठी प्रसंगी लागल्यास तात्काळ उपलब्ध करुन देण्यासाठी अभिलेख कक्ष व त्यामधील व्यवस्था खालीलप्रमाणे असणे जरुरीचे आहे.

१. अभिलेख ठेवण्यासाठी शक्यतो स्वतंत्र हॉल/ खोली असावी.
२. नेहमीच्या खोल्याप्रमाणे मोठया खिडक्या नसाव्यात. एक्सॉस्ट फॅन असावा.
३. अभिलेख कक्ष धुळीपासून मुक्त राहील अशी व्यवस्था करावी तसेच धुळीपासून बचाव करण्यासाठी नियमित फवारा मारण्याची व्यवस्था करावी.
४. कक्षामध्ये वीजेची, पंख्याची व्यवस्था असावी.
५. रुमालाचे रंगानुसार (अभिलेख प्रकार) रॅक/ जागा उपलब्ध करुन देणे आवश्यक असते.
६. त्याप्रमाणे जतन करावयाच्या संचिका अ, ब, क, क१ अशा वर्गीकरण प्रकारानुसार वेगवेगळया रंगाच्या कापडाच्या गठठयात बांधून ठेवण्यात याव्यात.
७. अभिलेख वर्गीकरण निहाय संचिकांच्या सुचीचे संगणकीकरण करण्यात यावे.
८. स्वतंत्र सेवकाकडे याबाबत काम सोपविण्यात यावे.
९. सक्षम अधिका-याच्या परवनगीशिवाय कोणतेही दस्तऐवज कागद, रजिस्टर इ. अभिलेख कक्षाच्या बाहेर देऊ नये.
१०. रुमालाच्या रंगानुसार संचिकांची देवाण-घेवाण करण्यासाठी नोंदवही ठेवण्यात यावी.
११. अभिलेख कक्ष नेहमीच सुस्थितीत व अद्ययावत ठेवण्यात यावा.
१२. अभिलेख कक्ष स्वच्छ असावा. दररोज साफसफाई करावी. भितींवरील धुळ, कोळीष्टके काढून टाकावीत.
१३. पाणी गळून किंवा भिंत जमीन यांच्या ओलाव्यामुळे कागदपत्र खराब होणार नाहीत याची दक्षता घ्यावी.
१४. कागदपत्रास वाळवी इत्यादी किड लागू नये यासाठी जंतू नाशके फवारावीत.

## (६) ड वर्गातील कागदपत्राची नाशक पध्दती :-

ड वर्गातील अभिलेख नाश करण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

- कार्यालयाकडे येणारा अनावश्यक पत्रव्यवहार, वृत्तपत्राचे अंक, उद्‌घाटन, निमंत्रण पत्रिका, विशेष समारंभाच्या निमंत्रण पत्रिका, दौऱ्याचे कार्यक्रम, अन्य कार्यालयाकडून सभेच्या/बैठकीच्या निमित्ताने येणाऱ्या टिपण्या, विशेषांक इ. कागदपत्र कार्यालय प्रमुखांनी विहीत पध्दतीचा अवलंब करुन खात्री करुन नाशक करावयाचे कागदपत्र एकत्रित करावयाचे असतात.

- अभिलेख जतन करण्यासाठी निश्‍चित केलेला कालावधी समाप्त झाल्यानंतर नष्ट करण्यायोग्य अभिलेख बाजूला काढण्यापूर्वी, अशा सर्व अभिलेखाचे दुस-यांदा सर्वेक्षण करावे आणि त्यात कोणताही अभिलेख तो ठेवण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या कालावधीपेक्षा अधिक कालावधी

ठेवणे आवश्यक असल्याचे लक्षात आल्यास त्याच्या प्रवर्गात बदल करुन त्यास सबंधित अधिका-याची मंजूरी घेऊन तो वरच्या प्रवर्गात ठेवावा.

- वरीलप्रमाणे वर्गीकरणानुसार ज्या संचिका/ अभिलेख अंतिमत: "ड" वर्गामध्ये आला आहे तो नष्ट करावयाचा अभिलेख कार्यालयाच्या कोणत्याही प्रयोजनासाठी आवश्यक नसल्याचे आणि त्या दिनांकाला लेखा परिक्षेतील कोणताही आक्षेप नसल्याची पुन्हां खात्री केल्यानंतर त्या प्रत्येक संचिकेसाठी संबंधित कर्मचा-यानें खालीलप्रमाणे एक चिठठी तयार करावी व त्यावर कार्यालय प्रमुखांची स्वाक्षरी घ्यावी.

| | |
|---|---|
| विषय :- | |
| फाईल नंबर :- | |
| फाईल सुरु दिनांक :- | |
| फाईल बंद दिनांक :- | |
| फाईलमधील एकूण पाने :- | |
| फाइल नष्ट केल्याचा दिनांक :- | |
| सही/- | सही/- |
| लिपिक/सबंधित कर्मचारी | कार्यालय प्रमुख |

- वरीलप्रमाणे प्रत्येक संचिकेच्या चिठठीवर स्वाक्षरी झाल्यानंतर याप्रमाणे नष्ट करावयाच्या संचिकेची खालीलप्रमाणे एक यादी तयार करुन त्यावर कार्यालय प्रमुखांची स्वाक्षरी घ्यावी.

**कार्यालयाचे नांव :-**

**यादी तयार केल्याचा दिनांक :-**

| अ.क्र. | फाईल नंबर | विषय | फाईल निंदणी केल्याचा दिनांक | वर्गीकरण | फाईल नष्ट केल्याचा शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |

- वरीलप्रमाणे तयार केलल्या यादीची एक प्रत कार्यालयाचे अधिक्षक यांच्याकडे देण्यात यावी.
- नष्ट करावयाचे कागदपत्र एकत्र केल्यानंतर, जिल्हास्तरावरुन अशा कागदपत्रांची विक्री करण्यासाठी दरकरार निश्चित केले असल्यास सदर एजन्सीकडे अशी कागदपत्रे देऊन वजनाचे प्रमाणात, निश्चित केलेल्या दरानुसार रक्कम संबंधित कंत्राटदाराकडून घेऊन ती रक्कम तात्काळ शासकीय जमा सदरी भरण्याची कार्यवाही करण्यात यावी अशी रद्दी ज्या कंत्राटदारांकडे सुपुर्द करणेसाठी ही कागदपत्रे पेपर मिलकडे दिली असल्याचा दाखला घेण्यात यावा.

**विशेष सुचना :-**

१. संचिकांचे जतन, संरक्षण नियमितपणे करावे, वर्षनिहाय, विषयनिहाय संचिकांचे वर्गीकरण करावे.
२. चालू वर्षाच्या अभिलेखाचे वर्गीकरण करतांना त्याच्या मागील कालावधीत जे अभिलेखाचे वर्गीकरण केलेले आहे त्यामधील अ वगळता ब, क व क१ या अभिलेखातील ज्यांचा कालावधी पूर्ण झालेला आहे. त्या अभिलेखाची पुन्हां पडताळणी करावी व त्यामधील जे अभिलख नष्ट करण्यायोग्य असतील ते विहित पध्दतीचा अवलंब करुन नष्ट करावेत.
३. मुदत पूर्ण झालेले अभिलेख विहित पध्दतीचा अवलंब करुन नष्ट करावेत,

४. दरवर्षी अभिलेख वर्गीकरणाचे काम विहित कार्यपध्दतीनुसार केल्यानंतर जतन केलेल्या अभिलेखाचे शक्यतो विनाविलंब संगणकीकरण करावे.

५. विशिष्ट प्रसंगी मागील काही वर्षातील, काही विषयाची माहिती उपलब्ध करुन देतांना काल मर्यादा निश्चित करुन दिली असल्यास अशा विषयाच्या संचिका तात्काळ उपलब्ध करुन देणे हा अभिलेख वर्गीकरणाचा प्रधान हेतू आहे.

**अव्यवस्थित अभिलेख :-**

Improper Record I.e.scattered record



**कागदपत्रनिहाय संचिका जतन करावयाचा कालावधी - वर्गीकरणानुसार गठ्ठा बांधण्यासाठी वापरावयाचे रंगीत रुमाल -**



## व्यवस्थित अभिलेख :-

Record kept Properly/Neatly



**नोंदवही - शाखा/विभागवार/विषयवार नस्तीची यादी**

| अ. क्र. | मुख्यविभाग /शाखा (दर्शक क्रमांक) | उप शाखा (दर्शक क्रमांक) | विषय | | नस्ती उघडल्याचा दिनांक | बंद केल्याचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मुख्य/ | दुय्यम | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

**नोंदवही - वर्गीकरण केलेल्या नस्तीचे अभिलेख विभागात स्थलांतर करणे.**

१) शाखा /विभागाचे नांव २) वर्ष

| अ. क्र. | नस्ती क्र. | विषय | नस्ती दिनांक | | नस्ती बंद करताना त्यातील पृष्ठे | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | प्रारंभ | अखेर | टिप्पणी भाग | पत्रव्यवहार भाग |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

| नस्तीचे वर्गीकरण | नस्ती नष्ट करण्याचा दिनांक | व्यक्तीची सही व दिनांक | | शेरा |
|---|---|---|---|---|
| | | नस्ती पाठविणे संबंधात | नस्ती मिळणे संबंधात | |
| ८ | ९ | १० | ११ | १२ |

नस्ती बंद करण्याचे आदेश टिप्पणी भागात घ्यावेत, निर्देश प्रत तयार करावी, नस्तीवर चिकटावावी.

१)नस्ती क्रमांक

२)विषय

३)नस्तीचे वर्गीकरण (अ/ब/क/ड)

४) नस्ती बंद करण्याचा दिनांक

५)अभिलेख शाखेत हस्तांतरीत केलेला दिनांक

६) नस्ती काढून टाकण्याचा दिनांक

सही नस्ती पाठविणा-या व्यक्तीचे नाव आणि पद

**अभिलेख शाखा**

वर्गीकरण करून आलेल्या नस्ती व्यवस्थीत लावणे -- संदर्भासाठी नस्ती मागविल्यास तत्परतेने व्यवस्था करणे -- नस्ती स्विकारण्यापुर्वी व्यवस्थित तपासून घेणे -- शाखेनुसार / विषयानुसार / वर्गीकरणानुसार नस्ती ठेवाव्यात

**नोंदवही - अभिलेख शाखेकडून संदर्भासाठी नस्तीचे स्थलांतर**

| अ. क्र. | दिनांक | नस्तीचा विषय | पृष्ठ क्रमांक | | कोणत्या विभागाला/ शाखेला दिली | प्राप्त कर्त्याचे नाव व सही दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | टिप्पणी | पत्रव्यवहार | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

| अभिलेख शाखेला नस्ती परत केल्याची दिनांक | परत करतानाची पृष्ठसंख्या | | जर सर्व कागद परत आले नसतील तर त्याची कारणे | अभिलेखपालाची सही व दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | टिप्पणी | पत्रव्यवहार | | | |
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |

**नोंदवही - नष्ट करावयाच्या वर्गीकृत नस्तीचा तपशील.**

| **अ .क्र** | वर्ष | | **विषय** | नस्तीचा तपशील | | | **नष्ट करावयाच्या नस्तीचा तपशील** | | **सही व दिनांक** | | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | दिनांक | महिना | | | | | **टिप्पणी पृष्ठ संख्या** | **पत्र व्यवहार पृष्ठ संख्या** | | | |
| | | | | **नस्ती क्रमांक** | **प्राप्त झालेल्या शाखेचे नाव** | **नस्तीचे वर्गीकरण** | | | अभिलेखा पाल | निबधक | ८ |
| १ | २ | | ३ | ४ | ५ | | ६ | | ७ | | |
| | | | | | | | | | | | |

# कार्यालयीन कामकाज पध्दती
# टपालाची आवक नोंदणी व वितरण पध्दती व पुढील कार्यवाही

१. **उद्देश** :- कार्यालयाच्या नांवे कार्यालयात येणा-या प्रत्येक पत्रांची सबंधित नोंदवहीमध्ये नोंद करण्यात येते. त्याप्रमाणे पत्राची नोंद झाल्यानंतर कार्यासनाकडून सदर पत्राला उत्तर पाठविण्यात येते. संबंधित पत्र पाठविणा-यास निर्णय तात्काळ मिळावा या हेतूने पत्राची नोंदणी व वितरण पध्दती कार्यालयात अंमलात आणली जाते.

२. **कार्यपध्दती :-** टपालाची स्वीकृती - टपालाची नोंदणी - वर्गीकरण. अधिका-यानी केलेले अवलोकन व कार्यवाहीच्यादृष्टीने दिशादर्शक सूचना यामुळे पत्रावर निर्णय घेण्यास विलंब लागत नाही.

३. **टपालाची स्वीकृती :**

अ. कार्यालयाच्या नांवे आलेली सर्व पत्रे नोंदणी शाखेमध्ये स्वीकारण्यात येतात.

ब. स्विकारलेली सर्व पत्रे संबंधित शाखांमध्ये विहित करण्यात आलेल्या नोंदवहीमध्ये नोंद करुन सबंधित कार्यासनाकडे पाठविण्यात येतात.

क. नागरीकांच्या सोईच्यादृष्टीने टपाल स्वीकृत विभाग शक्यतो कार्यालयाच्या मध्यवर्ती ठिकाणी असावा.

ड. टपाल स्विकृत केल्यानंतर सबंधित कर्मचा-याने त्याची पोहोच मागणीनुसार सबंधितांना तात्काळ द्यावी.

इ. पोस्टाव्दारे, कुरिअरव्दारे, स्थानिकरित्या अगर समक्ष आणून दिलेले सर्व टपाल नोंदणी शाखेत स्विकारण्यात यावे.

४. **नोंदणी शाखेत प्राप्त झालेल्या तातडीच्या पत्राबाबत करावयाची कार्यवाही.**

१. तारा, तातडीची चिन्हांकित केलेली पत्रे, विधानसभा/विधानपरिषद प्रश्न, वरिष्ठ कार्यालयाकडून आलेली सिलबंद पाकीटे प्राप्त झाल्यानंतर ती कार्यालयात उपस्थित असणा-या अधिका-याकडे तातडीने देण्याची व्यवस्था करावी.

२. टपालाचा विषय, गरज, कालावधी आणि प्राधान्य देण्याची आवश्यकता याबाबत सर्वसाधारण विचार करुन तातडीची पत्रे स्वतंत्र नोंदवहीत नोंदवून ती वरिष्ठांच्या निदर्शनास आणावीत. यामध्ये विलंब होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. **टपाल वरिष्ठांकडे सादर करतांना घ्यावयाची काळजी.**

१. सर्व कार्यासनांचे काम गतीने आणि कार्यक्षमतेने होण्यासाठी स्विकृत केलेले टपाल संबंधितांकडे तातडीने पाठविणे.

२. कोणतेही टपाल अधिका-यांकडे कार्यालयात अगर त्यांच्या निवासस्थानी पाठवितांना ते बंद पॅडमधून पाठविण्यात यावे.

३. सुटया स्वरुपात टपालातील कागदपत्रे पाठविली जाऊ नयेत.

४. अधिका-यांच्या नांवे असलेली पाकिटे न फोडता ती टपालात तशीच ठेवण्यात यावीत.

५. अधिका-यांच्या नांवे आलेली पाकिटे सबंधित अधिकारी रजेवर अगर दौ-यामुळे कार्यालयात अनुपस्थित असल्यास अशी पाकिटे त्यांच्या नंतरच्या अधिका-यांच्या निदर्शनास आणवीत.

६. इतर सर्व पाकिटे नोंदणी शाखेमध्ये उघडण्यात येतील. सर्व पत्रावर समासातील जागेमध्ये कार्यालयाचा नोंदणी शाखेचा शिक्का उमटवून त्यावर तारखेचा शिक्का मारतील.

७. नोंदणी शाखेत टपालावर उमटविणारा शिक्क्याचा नमुना पुढीलप्रमाणे असावा.

कार्यालयाचे नांव :

विभाग :

नोंदणी शाखेतील नोंदणी वही क्रमांक :

पत्राचा अनुक्रमांक :

सही :

**६. टपालावर चिन्हांकित शिक्का मारण्याबाबत :**

१. आलेले पत्र आपल्याच कार्यालयाचे आहे तसेच पत्रामध्ये नमूद केलेली सहपत्रे त्यासोबत आहेत याची खात्री नोंदणी शाखेतील कर्मचारी करुन घेईल.

२. अशी खात्री झाल्यानंतर टपालावर सबंधित कर्मचारी कार्यालयाचा नोंदणी शिक्का उमटवून त्यावर तारखेचा शिक्का मारेल.

३. नोंदणी शाखेतील लिपिकाकडे कार्यालयातील सर्व कार्यासनामध्ये जे विषय हाताळले जातात त्या विषयांची यादी उपलब्ध असणे आवश्यक आहे. त्यामुळे टपाल कोणत्या कार्यासनाकडे द्यावयाचे याचा निर्णय घेण्यासाठी विलंब होणार नाही.

४. टपालाचे वर्गीकरण करतांना, चिन्हांकन करतांना कांही शंका उद्‌भवल्यास नोंदणी शाखेतील लिपिकाने कार्यालयातील अधिक्षकांशी /वरिष्ठ अधिका-यांशी संपर्क साधावयाचा आहे.

५. तारा, प्राधान्यक्रमांची चिन्हांकित असलेली गोपनीय शिक्का अगर सिलबंद पाकिटे टपालामधून वेगळी काढून ती स्वतंत्ररित्या तातडीने वरिष्ठांकडे पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

**७. टपालाचे वर्गीकरण :**

नोंदणी शाखेमध्ये टपालाचे, कार्यालयाच्या सोईनुसार अर्धशाकीय पत्रे, तार, फॅक्स, विधानसभा प्रश्न, शासनाकडील तातडीची पत्रे व इतर पत्रव्यवहार याप्रमाणे टपालाचे वर्गीकरण करण्यात येईल.

**८. नोंदवहीमध्ये टपालाची नोंद करणे**

टपालाचे वर्गीकरण केल्यानंतर प्रत्येक टपालाची नोंद त्या सबंधित नोंदवहीत करण्यात येते. अशा नोंदवहयांमध्ये संबंधित लिपिक दररोज प्राधान्याने ठळक अक्षरात पानाच्या मध्यभागी तारीख लिहील व तारखेच्याखाली सदर दिवसाच्या टपालाची नोंद करेल, नोंदवहीत अशी नोंद अनुक्रमांकानुसार होईल, चढत्या क्रमांकाने दररोज पुढील अनुक्रमांक देण्यात येतील. दरवर्षी १ जानेवारीला अनुकमांक १ पासून सुरुवात होऊन ते अनुक्रमांक वर्षभर ३१ डिसेंबर पर्यंत सलग असतील व त्यानंतर पुढील वर्षी १ जानेवरीला पुन्हा १ क्रमांकाने सुरुवात होईल.

प्राप्त टपालाची मध्यवर्ती नोंदवहीमध्ये नोंद करावी. तसेच टपाल वाटप नोंदवहीमध्ये टपाल कोणाला वाटप केले त्याची नोंद घ्यावी. गोपनीय पत्र, माहीतीचा अधिकार, विधानसभा/ विधानपरिषद प्रश्न यासाठी वेगळी नोंदवही ठेवावी तसेच फॅक्स, इमेल यासाठी स्वतंत्र नोंदवही ठेवावी. रोज पत्रांचा मेळ बसला पाहीजे याबाबत काळजी घेण्यात यावी.

**नोंदवही - मध्यवर्ती आवक नोंदवही.**

| अ. क्र. | आवक संदर्भ | | | कोणाकडून आले | पाठविलेल्या संकलनाचा क्रमांक व दिनांक | विषय | जावक तपासणी क्रमांक | वर्गीकरण | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | क्रमांक | दिनांक | मिळाल्याचा दिनांक | | | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ७ | ९ | १० |

**नोंदवही - फॅक्स, इ मेल, फोन, निरोप इ.**

| अक्र | दिनांक | आवक पत्राचे स्वरूप | मिळाल्याचा दिनांक | कोणाकडून आले | थोडक्यात विषय | आवश्यक त्या कार्यवाहीसाठी पाठविले शाखा/दिनांक /वेळ | स्विकारणा -याची सही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

**नोंदवही - विभाग आवक नोंदवही**

| अ. क्र. | दिनांक | म.आ.क्र./ हस्तांतर क्रमांक | कोणाकडून प्राप्त झाले संदर्भ क्र. दिनांक | विषय | कोणाकडे पाठविले सहायक /उपविभाग अधिकारी | स्विकार णा-याची सही |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

पदनिर्देशित व्यक्ती पत्रविभाग प्रमुखाकडे सादर करील त्यांच्या सूचनांनुसार पुन्हां पदनिर्देशित व्यक्तीकडे पत्राचे वितरण केले जाते.

**९. अनौपचारिक संदर्भाची नोंद :**

१. एकाच कार्यालयातील/संस्थेतील एका विभागाकडून मूळ स्वरुपात दुस-या विभागाकडे अभिप्रायार्थ आलेल्या व पुन्हां त्याच विभागाकडे परत पाठवावयाच्या संचिका म्हणजे अनौपचारिक संदर्भ (Un Official Reference).

२. अशा अनौपचारिक संदर्भाची नोंद नोंदणी शाखेने स्वतंत्र नोंदवहीमध्ये करावयाची असते.

३. अनौपचारिक संदर्भ कार्यालयास केंव्हा प्राप्त झाला, अभिप्रायार्थ तो कोणत्या कार्यासनाकडे देण्यात आला व कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर तो पुनश्च त्या कार्यालयाकडे केंव्हा पाठविला याकडे नोंदणी शाख्रेतील लिपिकाने विशेष लक्ष देणे आवश्यक आहे.

४. अनौपचारिक संदर्भ सबंधित कार्यालयाकडे कार्यवाही करुन पाठवितांना तो मिळाल्याची पोहोच नोंदणी शाख्रेतील लिपिकाने घ्यावी.

५. अनौपचारिक संदर्भ नोंदवही अद्यावत असावी. सप्ताहाअखेर किती संदर्भ प्राप्त झाले. किती संदर्भावर निर्णय घेण्यात आले, किती संदर्भ कार्यालयाकडे परत पाठविण्यात आले, किती संदर्भ प्रलंबित आहेत याचा गोषवारा काढून तो वरिष्ठांकडे अवलोकनार्थ सादर करावा.

**१०. टपालाची नोंदणी पध्दती**

१. नोंदणी शाखेतील लिपिक प्राप्त झालेली पत्रे कार्यालयातील कार्यासनांना वितरण करण्यासाठी वरिष्ठांकडे सादर करेल.

२. अशी पत्रे सादर करतांना नोंदणी लिपिक, शाखेतील नोंदवहयामध्ये त्या पत्रांची नोद करेल.

**विभागप्रमुख/शाखा प्रमुख पत्राचे वाटप नोंदवही.**

| अ. क्र. | दिनांक | विभाग/ शाखा प्रमुख | पत्राचा आवक अ.क्र. सर्वसाधारण / अर्धशासकीय | एकूण पत्रे | स्विकारणा-याची सही |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

**११. टपालाचे कार्यासनाकडे वितरण :**

१. नोंदणी शाखेत कार्यासननिहाय नोंदवही ठेवण्यात येईल. आवक पत्राचा अनुक्रमांक नोंदवहीत नोदविल्यानंतर ती पत्रे कर्मचा-यांना वाटप करण्यात येतात.

२. कार्यासनाकडे टपालाचे वितरण विनाविलंब करण्यात यावे. कालमर्यादा असलेली पत्रे प्राधान्याने वितरित करावीत. सदर पत्रांवर कार्यवाही तात्काळ होण्याच्यादृष्टीने त्यांचेकडक विशेष लक्ष पुरवून सातत्याने पाठपुरावा करण्यात यावा. यावरच कार्यालयाची कार्यक्षमता अवलंबून असते.

**१२. चुकीची पाठविलेली किंवा चुकीची चिन्हांकित झालेल्या पत्रांबाबत**

१. सदर संदर्भ चुकीने आपल्याकडे दिला आहे असे कार्यासनाचे निदर्शनास आल्यास नोंदणी शाखेकडे तो तात्काळ पाठविण्यात यावा.

२. नोंदणी शाखेकडे असे संदर्भ कार्यासनाकडून देण्यात आल्यानंतर व या संदर्भाची नोंद आपल्या कार्यविवरणपत्रात तात्काळ करेल. त्या नोंदीवर नोंदणी शाखेतील लिपिकाची स्वाक्षरी शेंजारी तारखेची नोद ठेवण्यात येईल.

३. अन्य कार्यालयाकडे संदर्भ /पत्र पाठविणे आवश्यक असेल तर तशी नोंद घेऊन ते पत्र अन्य कार्यालयाकडे पाठविण्यात येईल.

**नोंदवही - दुस-या विभागात पत्र परत पाठविणे नमुना**

| अ. क्र. | दिनांक | पत्र नस्ती क्र. | पृष्ठ संख्या टिप्पणी पत्रव्यवहार | विषय | कोणाकडे पाठविले | स्विकार णा-याची सही |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

**१३. आवक पत्राची नोंद कार्य विवरण नोंदवहीमध्ये करणे.**

**कार्यविवरण पत्राची नोंदवही**

**नाव** **हुददा**

| अ. क्र. | पत्र प्राप्त दिनांक | नस्ती क्र. आवक क्र | कार्यवाहीखालील विषय | प्रकरण कोणास सादर केले व कोणत्या दिनांकास | शेरे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

१. सबंधित कर्मचारी प्राप्त टपालाची नोंद दरारोज आपले कार्य विविरणपत्र नोंदवहीमध्ये करेल.
२. कार्य विवरण पत्रात नोंद करतांना पत्र कोणत्या कार्यालयाकडून आले, पत्राचा क्रमांक व विषय याच्या नोंदी घेण्यात येतील.
३. कार्यविवरणपत्राचा चढत्या क्रमांकानुसार येणारा अनुक्रमांक प्रत्येक पत्रावर टाकण्यात येईल.
४. कार्य विवरणपत्राचा साप्ताहीक गोषवारा काढतांना प्राप्त संदर्भ संख्या, कार्यवाही पूर्ण झ ालेल्या संदर्भांची संख्या व प्रलंबित संदर्भांची संख्या नमूद करुन खालीलप्रमाणे गोषवारा वरिष्ठांचे अवलोकनार्थ दर सोमवारी सादर करण्यात येईल.

**आठवडा आढावा**

**नोंदवही ७. कार्यविवरण पत्राचा साप्ताहिक गोषवारा.**

नाव आणि पद - - - - सप्ताह - - - अखेरचा अहवाल

१ - प्रलंबित पत्रे / मागच्या आठवडयातील संदर्भासह

२ - आठवडयात आलेली पत्रे

३ - एकूण पत्रे

४ - उत्तर पाठविलेली पत्रे

५ - नियतकालानुसार प्रलंबित पत्रे

- एक आठवडयापर्यत
- दोन आठवडयापर्यत
- तीन आठवडयापर्यत
- त्यापेक्षा जास्त

६ - प्रलंबित पत्रे / संदर्भ यांचे वर्गीकरण

- राज्य/केंद्र शासन
- अशासकीय संस्था - महामंडळ
- अंतर्गत

## १४. अधिका-यांनी टपालाचे अवलोकन करणे

१. नोंदणी शाखेकडून आलेल्या टपालाच्या पॅडमधील टपालाचे अवलोकन करणे.

२. टपाल पाहिल्याचे निदर्शक म्हणून प्रत्येक पत्रावर आद्याक्षरासह स्वाक्षरी करणे.

३. कालमर्यादा, विषयाचे महत्व व गांभीर्य विचारात घेऊन पत्रावर कार्यवाही करण्याबाबत कार्यासनाला पत्रावर संक्षिप्त सूचना देणे.

४. वरिष्ठांशी चर्चा करणे, सुरु असलेल्या पत्रव्यवहारातील नजिकच्या काळातील संदर्भ पाहणे, स्मरणपत्र पाहणे, दूरध्वनीवरुन माहिती वरिष्ठ कार्यालयास पुरविणे अगर कनिष्ठ कार्यालयाकडून दूरध्वनीवरुन माहिती मागवून घेणे असे संदर्भ टपालातून वेगळे काढून स्वत:कडे ठेवणे, अपेक्षित कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर अशी पत्रे संबंधित कार्यासनाकडे देण्याची व्यवस्था करणे.

५. अधिका-यांनी टपालाचे अवलोकन करुन टपालाचे पॅड परत दिल्यानंतर अधिक्षकांनी टपालाचे कार्यासननिहाय वाटप करणे.

## १५. टपालातील पत्रांवर करावयाची कार्यवाही (प्राथमिक स्तर)

१. प्राप्त झालेल्या टपालामधील पत्रांचे अवलोकन केल्यानंतर सद्य:स्थितीत त्याविषयक सुरु असलेल्या संचिका व टपालातील त्या अनुषांगिक विषयांची पत्रे एकत्रित करणे.

२. नेहमी कार्यालयाच्यावतीने पाठविण्यात येणा-या माहिती अगर त्याबाबत झालेल्या धोरणात्मक निर्णयानुसार पत्राचा विषय असेल तर त्यावर कार्यवाही करणे. पत्राचे प्रारुप सादर करुन ते मान्य करुन घेऊन पत्राचे उत्तर सबंधितांना पाठविणे.

३. पत्रावर कार्यवाही करतांना त्यावर अभिप्राय घेण् गरजेचे असेल तर टिपणी सादर करुन तसा अभिप्राय घेण्यात यावा. त्यानुसार पत्राच्या उत्तराचे प्रारुप तयार करुन ते मान्य करुन घेणे व पत्राचे उत्तर सबंधितांना निर्गत करणे.

४. पत्राचा विषय पाहता या विषयावर सद्य:स्थितीत संचिका उपलबध नाही. तेंव्हा प्रकरण नव्याने सुरु करण्यासाठी संचिका तयार करणे व त्यासाठी पत्रव्यवहार सुरु करणे.

५. तातडीचे-प्राधान्य-कालमर्यादीत म्हणून चिन्हाकित केलेल्या पत्रावर प्राधान्याने कार्यवाही करणे. त्यासाठी निर्णयासाठी टिपणी अगर उत्तराचे प्रारुप मंजूरीसाठी सादर करणे.

६. नमूद केलेली चिन्हांकित पत्रे तात्काळ कार्यवाहीसाठी घेणे. अ.तातडीचे ब.तात्काळ क.टंचाई प्राधान्य ड.विधानसभा-विधान परिषद प्रश्न इ.मा. लोकआयुक्त संदर्भ फ.कोर्ट संदर्भ. अशा प्रकरणांवर शक्यतो त्याच दिवशी सकाळी कार्यवाही करावी. विलंब टाळावा. प्राधान्य देऊन अशा संदर्भावर कार्यवाही करणे.

७. क्र. ६ मध्ये नमूद केलेल्या संदर्भावर कार्यवाहीसाठी संचिका वरिष्ठांकडे निर्णयासाठी सादर करतांना प्राधान्य अशी पताका लावून संचिका पाठविणे. कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर प्राधान्य ही पताका संचिकेपासून काढून टाकणे.

८. एखादे प्रकरण विहित काल मर्यादेत सादर करण्यासाठी तयार नसेल तर ते प्रकरण कालमर्यादा वाढवून घेण्यासाठी वरिष्ठांकडे सादर करणे. वरिष्ठांकडून ते प्रकरण सादर करण्यासाठी मुदतवाढ दिल्याची मान्यता संचिकेवर लेखी स्वरुपात घेणे त्यानंतर वाढवलेल्या मुदतीमध्ये प्रकरण सादर करणे.

९. कार्यालयाकडे एखाद्या प्रकरणांवर अंतिमरित्या कार्यवाही करण्याच्यादृष्टीने आवश्यक असणारी माहिती /सांख्यिकी माहिती उपलब्ध नसते, अशावेळी लागणारी माहिती जमा करण्यासाठी कनिष्ठ कार्यालयाशी संपर्क साधणे. त्याबाबत पत्रव्यवहार करणे.

१०. एखाद्या प्रकरणात पत्रव्यवहार करतांना शासन आदेश, परिपत्रक अगर संदर्भ याची आवश्यकता पत्राच्या उत्तरासोबत लागत असेल तर त्या संदर्भाच्या झेरॉक्स प्रती काढणे.

११. ज्या पत्रांवर कोणतीही कार्यवाही करण्याची आवश्यकता नसते किंवा एखाद्या पत्राच्या एकापेक्षा अधिक प्रती प्राप्त होतात, तार संदेशाच्या टपालातून प्रती प्राप्त होतात, केवळ माहितीसाठी पत्राच्या प्रती  पाठविल्या जातात असे संदर्भ संकिर्ण विषयासाठी संचिका यामध्ये समाविष्ट करावेत. त्या पत्रांवर दप्तरी दाखल असा शेरा देऊन त्यावर कार्यालयातील अधिक्षकांची सही घ्यावी.

**[ टीप :- उपलब्ध माहितीच्या आधारे वाचन साहित्य तयार करण्यात आले आहे. कालपरत्वे यामध्ये बदल होण्याची शक्यता आहे. -- सन २०१० ]**